**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास घटकाच्या सन २०१८-१९ च्या वार्षिक कृती आराखड्यास (रू. ४१६०.८४ लक्ष) प्रशासकीय मान्यता प्रदान करणे व सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.१६४१.६७ लक्ष निधी वितरण करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाशेअ-४४१८/प्र.क्र.८१/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २१ जून, २०१८

**वाचा-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. शासन निर्णय क्रमांक ०४१८/प्र.क्र.१५५/१४ अे, दि. २७ एप्रिल, २०१८
३. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-२१/२०१८-RFS-III, दिनांक ३१ मे, २०१८ (तीन पत्रे)
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-२१/२०१८/RFS.III, दि. ०४ जून, २०१८.
५. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ.आ.-२०१८/कोक्षेवि/वाकृअ/प्र.क्र.१०/१७५/रासक, दि.०५ जून, २०१८

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत कोरडवाहु शाश्वत शेती विकास कार्यक्रम राज्यात राबविण्यात येत होता. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाने केंद्र पुरस्कृत योजनांची पुर्नरचना केली असून काही योजना एकत्रित करुन अभियानांतर्गत राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर पुर्नरचनेमध्ये कोरडवाहू शेती विकास कार्यक्रम (RADP) या योजनेचा समावेश राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानामध्ये केला आहे. त्यानूसार कोरडवाहू शाश्वत शेती विकास कार्यक्रम सदर अभियानामध्ये कोरडवाहु क्षेत्र विकास [Rain fed Area Development (RAD)] घटक म्हणून राबविण्यात येत आहे.

सदर योजना सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिस्स्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र. ४ येथील पत्रान्वये सन २०१८-१९ या वर्षासाठी केंद्र हिस्सा रु. २४९६.५० लक्ष व राज्य हिस्सा रु.१६६४.३३लक्ष अशा एकूण रु. ४१६०.८४ लक्ष रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास मान्यता कळविलेली आहे. त्याचप्रमाणे संदर्भाधीन अ.क्र. ३ येथील पत्रांन्वये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.९८५.००लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु.१४७.५० लक्ष,व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु.११७.५०लक्ष असा एकूण रु.१२५०.०० लक्ष एवढा निधी वितरीत केला आहे.

त्यानुसार, रु.४१६०.८४ लक्ष एवढया रकमेचा कार्यक्रम सन २०१८-१९ या वर्षात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याचा व सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्स्यापोटी रु.९८५.०० लक्ष व त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा रु.६५६.६७ लक्ष अशा एकूण रु.१६४१.६७ लक्ष रक्कम सदर कार्यक्रमास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) हा घटक सन २०१८-१९ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र हिस्स्यापोटी रु. २४९६.५०लक्ष (रूपये चोवीस कोटी शह्याण्णव लक्ष पन्नास हजार फक्त) व राज्य हिस्स्यापोटी रु. १६६४.३३ लक्ष (रूपये सोळा कोटी चौसष्ट लक्ष तेहत्तीस हजार फक्त ) असा एकूण रु . ४१६०.८४ लक्ष (रूपये एकेचाळीस कोटी साठ लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) रकमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. चालू वर्षाकरिता सदर योजनेच्या वार्षिक कृती आराखड्याचा बाबनिहाय तपशील परिशिष्ट - अ येथे जोडले आहे.

२. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास कार्यक्रमाची सर्वसाधारण प्रवर्गासाठी अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र हिस्स्यापोटी रु.९८५.०० लक्ष ( रुपये नऊ कोटी पंच्याऐंशी लक्ष फक्त) व राज्य हिस्स्यापोटी रु. ६५६.६७ लक्ष (रुपये सहा कोटी छपन्न लक्ष सदुसष्ट हजार फक्त) अशा एकूण रु.१६४१.६७ लक्ष ( रुपये सोळा कोटी एकेचाळीस लाख सदुसष्ट हजार फक्त) रक्कम अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वावारे आयुक्त ( कृषि) यांना पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

**( रू. लाखात)**

| प्रवर्ग | केन्द्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण प्रवर्ग | ९८५.०० | ६५६.६७ | १६४१.६७ |

३. राष्ट्रीय शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरीता उपलब्ध करून देण्यात आलेला केन्द्र हिस्स्याचा रू. ९८५.०० लक्ष (रुपये नऊ कोटी पंच्याऐंशी लक्ष फक्त ) निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्र.डी-३,**

२४०१-पीक संवर्धन,

१०९-विस्तार व प्रशिक्षण,

०१-माहिती व प्रसारण,

(०१)(५१)- कृषी उन्नती योजना, राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान, अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (कें. पु. यो.) (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ ९५५४)

३३- अर्थसहाय्य.

तसेच राष्ट्रीय शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरिता उपलब्ध करून देण्यात आलेला राज्य हिस्स्याचा रू. ६५६.६७ लक्ष (रुपये सहा कोटी छपन्न लक्ष सदुसष्ट हजार फक्त) निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा

**मागणी क्र.डी-३,**

२४०१-पीक संवर्धन,

१०९-विस्तार व प्रशिक्षण,

०१-माहिती व प्रसारण,

(०१)(५३)- कृषी उन्नती योजना, राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान, अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४०%), (सर्वसाधारण) (२४०१ ए२७२)

३३- अर्थसहाय्य

४. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी सर्वसाधारण प्रवर्गाकरीता उपलब्ध करून दिलेला रू. १६४१.६७ लक्ष निधी जिल्हा निहाय / कार्यालय निहाय वाटप करण्याकरीता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी सदर निधी PFMS प्रणालीव्दारे जिल्हानिहाय वितरीत करावा.

५. या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू. १६४१.६७ लक्ष निधीचे विविध कार्यालयांच्या स्तरावर कोषागारातून आहरण व वितरणाकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी आणि सहायक संचालक (लेखा-१) कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

७ सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दि. २७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनूसार करण्यात यावी.

८. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

९. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

१०. कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सुचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

११. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२११७४४१०७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant
Chandrakant
Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffa a62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95 f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.06.21 17:43:21 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री( कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता,विधान सभा,विधानमंडळ सचिवालय,मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेता,विधान परिषद,विधानमंडळ सचिवालय,मुंबई
५. मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग,मंत्रालय मुंबई
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय मुंबई
९. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
१२. जिल्हाधिकारी (सर्व)
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
१५. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१७. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
१९. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/
२०. सर्व मंडळ कृषि अधिकारी
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
२३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२४. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२५. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
२६. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२७. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२८. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२९. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
३०. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
३१.निवडनस्ती ८-अे.

## परिशिष्ट-अ
## राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत-कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमाचा वार्षिक कृती आराखडा सन २०१८-१९

**एकात्मिक शेती पध्दती क्षेत्र-७४२५ हे.** **प्रस्तावित प्रकल्प संख्या-७४**

| अ.क्र | घटक | युनिट | मापदंड (रू) | प्रति युनिट देय मापदंड | मंजूर घटक संख्या | अनुदान टक्केवारी | मंजूरकार्यक्रम (केन्द्र + राज्य हिस्सा) (रू. लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (अ) एकात्मिक शेती पध्दती | | | | | | | |
| १ | फलोत्पादन आधारित शेती पध्दती | हे | ५०००० | २५००० | २१६० | ५० | ५४०.५० |
| २ | पशुधन आधारित शेती पध्दती | हे | ५०००० | २५००० | २४३० | ५० | ६०७.५० |
| ३ | दुग्धोत्पादन आधारित शेती पध्दती | हे | ८०००० | ४०००० | २८३५ | ५० | ११३४.०० |
| एकूण (अ) | | | | | | | २२८१.५० |
| (ब) मुल्यवर्धन आणि साधन संपत्ती संवर्धन | | | | | | | |
| आ१ | ग्रीन हाऊस ट्युब्युलर टाईप नैसर्गिक वायुविजन | चौ.मी. | ९३६ | ४६८ | ६०००० | ५० | २८०.८० |
| २ | मधुमक्षिका पालन | कॅालन ी | २००० | ८०० | १८० शेतकरी (प्रती शेतकरी २५ कॅालनी) | ४० | ३६.०० |
| ३ | शेडनेट हाउस | चौ.मी. | ७१० | ३५५ | १३५००० | ५० | ४७९.२५ |
| ४ | काढणी पश्चात साठवणुक तंत्रज्ञान | चौ.मी | ४००००० | २००००० | २७० | ५० | ५४०.०० |
| ५ | मूरघास युनिट | संख्या | १२५००० | १२५००० | १३५ | १०० | १६८.७५ |
| ६ | गांडुळ खत युनिट कायमस्वरूपी | संख्या | १००००० | ५०००० | ३१५ | ५० | १५७.५० |
| ७ | हिरवळीचे खत | हे | ४००० | २००० | ९४५ | ५० | १८.९० |
| | एकूण ब | | | | | | १६८१.२० |
| | एकूण (अ+ब) | | | | | | ३९६२.७० |
| | (क) प्रशासकिय खर्च | | | | | ५ | १९८.१४ |
| **एकूण (अ+ब+क)** | | | | | | | **४१६०.८४** |

**टीप- राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत-कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी केन्द्र शासनाने सन २०१८-१९ चा वार्षिक कृती आराखडा मंजूर करतेवेळी योजनच्या मार्गदर्शक सूचनेनुसार किमान १०० हे. क्षेत्राचा एक प्रकल्प हाती घेण्याचे सूचित केले आहे.**

---